**स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित स्वयंसहायता गटांचे संघीकरण करण्यासाठी गाव, मंडळ, तालुका, व जिल्हास्तरावर सेवासंघ स्थापन करणे.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्र.स्वग्रावि-२००८/प्र.क्र.१००३/योजना-३

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांक : ६ जुलै , २००९

**<u>शासन निर्णय:-</u>**

ग्राम विकास विभागामार्फत १९९९ पासून दारिद्रय रेषे खालील व्यक्तिंचे जीवनमान उंचावून देशातील प्रगत तंत्रज्ञान सोप्या पध्दतीने त्यांच्यापर्यंत पोहोचवून त्यांना रोजगार मिळवून देऊन त्यांचे उत्पादन किमान रु २०००/- प्रति महा इतके व्हावे या उद्देशाने स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना (७५% केंद्र व २५% राज्य पुरस्कृत) योजना राबविण्यात येत आहे. यामध्ये स्वयंसहायता गटास प्राधान्य देण्यात आले असून या गटांमध्ये किमान १० व्यक्ती व नियंत्रणाबाबतच्या समन्वयाच्या दृष्टीने कमाल २० व्यक्तींचा सहभाग असणे आवश्यक आहे.

२. सन १९९९ पासून मार्च, २००९ अखेर या योजनेअंतर्गत राज्यामध्ये एकूण २,०६,६०८ स्वयंसहाय्यता गट स्थापन झाले असून त्यातील ५३,४६५ स्वयंसहाय्यता गटांनी आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत. एकूण गटांपैकी महिला स्वयंसहायता गटांची संख्या १,६७,३१३ इतकी असून त्यापैकी ४५,४४९ महिला स्वयंसहाय्यता गटांना आपले आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत.

३. या स्थापित स्वयंसहायता गटांनी या योजनेच्या मदतीने आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत. त्याचप्रमाणे असेही दिसून आले आहे की, या स्वयंसहायता गटांनी समाजातील अन्य क्षेत्रातही चळवळी राबविणे सुरु केले आहे. त्याच्या कार्याची व्याप्ती पहाता, त्यांचे कार्य केवळ स्वतःच्या आर्थिक उध्दारासाठी मर्यादीत न रहाता एकूण समाजातील विविध लोकोपयोगी क्षेत्रामध्ये त्यांचा सहभाग वाढत आहे. यादृष्टीने स्वयंसहायता गटांचे महत्व असाधारण आहे. व्यक्तींचा समुह झाल्याने व्यक्तींच्या सक्षमीकरणाची प्रक्रीया सुरु झाली. आता अशा समुहांना काही अडचणींचा सामना करावा लागत आहे. उदा. कच्च्या मालाची उपलब्धता, उत्पादीत वस्तुंना हक्काची बाजारपेठ त्यासाठी लागणारे अर्थसहाय्य इत्यादी. त्यामुळे काही गटांचा संघ केल्यास या गरजा पूर्ण होवू शकतील असे अभ्यासांती लक्षात आल्याने, या गटांना प्रोत्साहन देण्यासाठी, गटांना मदत व्हावी व त्यांच्याआपसातील समन्वय सुलभ व्हावा यासाठी स्वयंसहाता गटांची गाव, मंडळ, तालुका व जिल्हा स्तरावर सेवासंघ स्थापन करण्याचा शासन निर्णय घेतला आहे.

४. त्यानुसार या सेवा संघाची रचना पुढीलप्रमाणे असेल.:- १० ते २० सदस्य मिळून एक स्वयंसहायतागट तयार होतो, असे एका गावातील सर्व गट मिळून गाव पातळीवर एक सेवा संघ (ग्राम संघ) तयार होईल. अशा गाव संघासाठी किमान १० स्वयंसहायता गटाची आवश्यकता असेल. गावामध्ये पुरेसे गट नसल्यास, आसपासच्या गावातील गटांचा मिळून असा समुह तयार करण्यात येईल. या ग्रामसेवा संघात प्रत्येक स्वंयसहायता गटांतील, गटांचे अध्यक्ष उपाध्यक्ष व हिशोबनिस असे दोन सदस्य असतील. १५ ते २० गावांसाठी महसुली मंडळस्तरावर मंडळ सेवा संघ कार्यरत राहील. प्रत्येक ग्रामसेवा संघातून २ प्रतिनिधी मंडळ सेवा संघावर येतील. सर्वसाधारणपणे तालुक्यात ५-६ मंडळ सेवा संघांचा समावेश असेल व तालुकास्तरावर तालुका सेवा संघ कार्यरत राहील. तसेच जिल्ह्यातील सर्व तालुके मिळून एक जिल्हा सेवा संघ (जिल्हा संघ)असेल.

अ) **<u>सदस्य निवडीची प्रक्रीया :</u>** गाव पातळीवरील सेवासंघ वगळता उर्वरीत प्रत्येक सेवा संघात खालच्यास्तरावरील किमान २ सदस्य सेवा संघाच्या बैठकीमध्ये मौखिक पध्दतीने निवड करुन त्यांच्या स्तरावरील सेवा संघात सदस्य म्हणुन राहतील. सदस्यांसाठी अर्हता किमान लिहिता वाचता येणे व व्यवहार करता येणे ही राहील.

ब) **सेवा संघाची रचना :** प्रत्येक सेवा संघामध्ये अध्यक्ष, उपाध्यक्ष, सचिव व हिशोबनिस राहील. याशिवाय सेवा संघाच्या या समितीस आवश्यक वाटल्यास समिती सदस्यांमधुन सहकार्यासाठी कमाल २ सदस्याचा मर्यादेपर्यंत सदस्य निवडु शकेल.

क) **सेवा संघाच्या बैठका:** सेवा संघाने आपल्या वरिष्ठ सेवा संघाच्या बैठकांच्या दिनांकाशी समन्वय साधुन महिन्यातून किमान २ बैठकांचे दिनांक विहित करणे आवश्यक आहे.

ड) **सेवा संघाचे कार्य :**

१ ग्राम सेवा संघ:-
अ) गटातील आपसातील समन्वय राखणे,
ब) गटांच्या गरजा, अडचणी मंडळ स्तरावर कळविणे,
क) उपक्रमात येणा-या अडचणी त्यासाठी लागणारी तज्ञ मदत कर्जाची आवश्यकता याबाबत मंडळ स्तरावर कळविणे.
ड) कर्ज परतफेडीवर देखरेख,

२ मंडळ सेवा संघ :-
अ) ग्रामसेवा संघातील आपसातील समन्वय राखणे,
ब) ग्रामसेवा संघाच्या गरजा,अडचणी तालुका स्तरावर कळविणे,
क) उपक्रमात येणा-या अडचणी त्यासाठी लागणारी तज्ञ मदत, कर्जाची आवश्यकता याबाबत तालुका स्तरावर कळविणे,
ड) स्वंयसहायता गटांच्या कर्ज परतफेडीवर देखरेख.

३ तालुका सेवा संघ :-
अ) मंडळ संघातील आपसातील समन्वय राखणे
ब) खालील संघाच्या गरजा,अडचणी तालुका स्तरावर सोडविण्याचा प्रयत्न करणे. त्यात अपयश आल्यास जिल्हा स्तरावर कळविणे,
क) गटांच्या उपक्रमात येणा-या अडचणी, त्यासाठी लागणारी तज्ञ मदत,कर्जाची आवश्यकता याबाबत पाठपुरावा करणे, तसेच याबाबत जिल्हास्तरावर अधिक मदतीसाठी कळविणे,
ड) स्वंयसहायता गटांच्या कर्ज परतफेडीवर देखरेख, बँकांशी संपर्क व समन्वय त्याचप्रमाणे गट विकास अधिकारी यांचेशी संपर्क व समन्वय.

४ जिल्हा सेवा संघ :-
अ) खालील स्तरावरील संघातील आपसातील समन्वय राखणे
ब) खालील स्तरावरील संघाच्या गरजा,अडचणी सोडविण्याचा प्रयत्न करणे,त्यात अपयश आल्यास जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेशीसंपर्क करणे, स्तरावर कळविणे,
क) गटांच्या उपक्रमात येणा-या अडचणी, त्यासाठी लागणारी तज्ञ मदत .कर्जाची आवश्यकता याबाबत पाठपुरावा करणे,
ड) स्वंयसहायता गटांच्या कर्ज परतफेडीवर देखरेख, बँकांशी संपर्क व समन्वय त्याचप्रमाणे प्रकल्प संचालक यांचेशी संपर्क व समन्वय.

**इ) संघाचा आस्थापना खर्च :-**

संघाच्या दैनंदिन किमान खर्चासाठी व इतर गरजांसाठी राज्यशासनाकडुन सुरुवातीची ४ वर्षे मदत करण्यात येईल. प्रत्येक पुढील वर्षी या मदतीला २५% कपात करण्यात येईल. ४वर्षानंतर हे सेवासंघ स्वत:च्या उत्पन्नावर स्वयंपूर्ण होतील अशी अपेक्षा आहे. सेवा संघाच्या उत्पन्नासाठी सभासद गटांकडुन/संघाकडून नाममात्र फी आकारण्यात येईल. आदिवासी क्षेत्रासाठी ही मर्यादा ६ वर्षासाठी असेल. या क्षेत्रातील मदत पुढील ५ वर्षात प्रत्येक वर्षी १५%प्रमाणे कपात करण्यात येईल. ही सर्व मदत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडुन करण्यात येईल.

**फ) संघाचे नोंदणीकरण (रजिस्ट्रेशन)**

प्रत्येक सेवासंघ The Indian Public Trusts Act, **१९८२** च्या तरतुदी अंतर्गत नोंदणीकृत असेल.

**ज) सेवासंघाकडून आकारण्यात येणारी फी**

संघीकरणासाठी प्रथमतः सदस्य गटास मासिक रु.१०/- इतकी नाममात्र फी आकारण्यात येईल. गटास फिरता निधी प्राप्त झाल्यावर सदस्य फी म्हणुन मासिक रु. २५/- व गटास अनुदान +कर्ज मिळाल्यानंतर सदस्य फी म्हणुन मासिक रु.५०/- आकारण्यात येतील. जेणेकरुन संघास स्वतःचे उत्पन्न मिळून ४ वर्षानंतर, आदिवासी क्षेत्रातील संघ ६ वर्षानंतर स्वतःच्या उत्पन्नावर स्वयंपूर्ण होईल.

५. प्रत्येक सेवासंघाच्या दैनंदिन कामकाजासाठी कार्यालय असणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे संघाची जागा उपलब्ध नसल्यास जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून शासकीय/ जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत यांची जागा, शासकीय जागा नसल्यास, भाडयाची जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. जागेचे भाडे जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत अदा करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२००९०७०६१६२६०१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अविनाश सुभेदार)
उपसचिव

प्रत,

१. सचिव, वित्त विभाग, /नियोजन विभाग/महिला व बाल विकास/सामाजिक न्याय विभाग/ आदिवासी विकास विभाग/ नगर विकास विभाग,
२. विभागीय आयुक्त, (सर्व)
३. जिल्हाधिकारी, (सर्व)
४. व्यवस्थापकीय संचालक, नाबार्ड/माविम,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा. (सर्व)
६. उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)
७. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
८. अप्पर संचालक, ए.ग्रा.वि.का.कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.
९. निवड नस्ती, योजना-३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.